**वित्तीय वर्ष अखेर संक्षिप्त देयकांवर रक्कम**
**काढून ठेवण्यावर निर्बंध घालण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक, क्रमांक - मआख - १०.०३/प्र.क्र.८३/२००३/विनियम**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- ४ सप्टेंबर, २००३**

**परिपत्रक**

अनेक शासकीय कार्यालयांकडून वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूद व्यपगत होऊ नये, म्हणून त्या वर्षा अखेरीस कोषागारातून / अधिदान व लेखा कार्यालयातून संक्षिप्त देयकांवर रक्कम काढण्याची प्रवृत्ती वाढली असून त्याची तपशीलवार देयके सादर करण्यास बराच विलंब केला जात असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. जेव्हा एखाद्या बाबींसाठी त्वरीत रक्कम प्रदान करावयाचा प्रसंग उद्भवतो तेव्हाच संक्षिप्त देयकावर रक्कम काढावयाची सुविधा निर्माण करण्यात आली आहे. त्याचा अर्थ वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदान व्यपगत होत आहे, म्हणून संक्षिप्त देयकावर रकमा काढून ठेवणे हा उपाय नव्हे. निधी तिजोरी बाहेर राहून शासनाला त्यावरील व्याजाला मुकावे लागते, तद्वतच अन्य महत्वाच्या बाबीवर खर्च करता येत नाही. तसेच अशा रकमा बाहेर राहिल्यामुळे त्यातून चोरी, अपहार, अफरातफर, लबाडी होण्याची शक्यता नाकारता येत नाही.

२. वरील बाबी लक्षात घेता या प्रवृत्तीला पायबंद घालणे आवश्यक आहे. सबब वर्ष अखेरीस कोणत्याही प्रकारे संक्षिप्त देयकावर रक्कम काढण्यावर कडक निर्बंध घालण्यात येत आहे. कोणत्याही परिस्थितीत अशी संक्षिप्त देयकांवर रक्कमा काढण्यास मान्यता देण्यात येणार नाही, असे सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या निदर्शनास आणण्यात येत आहे. तद्वतच वर्षभरात संक्षिप्त देयकावर काढण्यात येणाऱ्या रकमांची तपशीलवार देयके विहित केल्यानुसार रक्कम काढल्यापासून एक महिन्याच्या आत सादर करण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा त्यानंतरची संक्षिप्त देयके कोणत्याही परिस्थितीत पारित केली जाणार नाही, याची सुध्दा नोंद सर्व मंत्रालयीन विभागांनी घ्यावी.

गौजोरसाळ
( गौ.जो.रसाळ )
शासनाचे उप सचिव.

( कृ.मा.प

रोटा/एच–770(12,500+15–9–03)1

C:\WINDOWS\Desktop\CHARTER FINANCE73.2001.lwp

प्रति

* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०

* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०

* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर

* ४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर

५. राज्यपालांचे सचिव

६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव

८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक

९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव

१०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१

११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

१४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई

* १५. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई

* १६. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई

* १७. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई

* १८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

* १९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई

* २०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई

* २१. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ४०० ०५१

२२. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/ नाशिक / अमरावती

२३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई / पुणे / नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती

२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

२५. सर्व उप कोषागार अधिकारी

२६. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख

२७. सर्व विभागीय आयुक्त

२८. सर्व जिल्हाधिकारी

२९. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

३०. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी

३१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१

३२. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१

३३. वित्त विभागातील सर्व कार्यासने

३४४. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग

* पत्राद्वारे

---